**कोव्हिड-१९ संबंधित कर्तव्य बजावत असताना कोरोना विषाणूचा संसर्ग होऊन मृत्यू पावलेल्या कर्मचाऱ्यांच्या कुटुंबियांना विमाकवच/सानुग्रह सहाय्य मंजूर करण्याबाबत.**
**कै. (श्री.) शेख अन्सार ईस्माईल,सहशिक्षक**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन ज्ञापन क्रमांक : सहाय्य-२०२५/प्र.क्र.५/टीएनटी-६**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई -४०० ०३२
दिनांक : ०५ मार्च, २०२५

**संदर्भ :-**

(१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण २०२०/प्र.क्र.४/व्यय-९, दिनांक २९.०५.२०२०, दिनांक. १४.१०.२०२० व दिनांक १४.०५.२०२१
(२) शालेय शिक्षण व क्रीडा विभागाचे क्रमांक: सहाय्य-२०२०/प्र.क्र.८१/टीएनटी-६, दिनांक ०७.१२.२०२० व दिनांक १६.०३.२०२१ चे पत्र.
(३) गटविकास अधिकारी, (वर्ग-१) पंचायत समिती, परंडा व गट शिक्षणाधिकारी, पंचायत समिती परंडा यांचेदिनांक २५/०८/२०२१ रोजीचे प्रमाणपत्र
(४) तहसिलदार परंडा, गट विकास अधिकारी, गटविकास अधिकारी, (वर्ग-१) पंचायत समिती, गट शिक्षणाधिकारी, पंचायत समिती परंडा यांचे दिनांक २६/११/२०२१ चे प्रमाणपत्र.
(५) शिक्षण संचालक(माध्यमिक) यांचे पत्र क्र. शिसंमा/२०२४/टि-७/कोव्हिड-१९/विमा कवच/सहाय्य/शेख अन्सार/६४०१, दि. १०/१२/२०२४

**ज्ञापन :-**

कै. (श्री.) शेख अन्सार ईस्माईल,सहशिक्षक, श्रीमती पवित्राबाई दैठणकर हाय.रत्नापूर ता.परांडा जि.धाराशिवयांचा कोव्हिड-१९ संबंधित कर्तव्य बजावताना कोव्हिड-१९ मुळे दिनांक २१/०५/२०२१ रोजी मृत्यू झालेला आहे.

२. कै. (श्री.) शेख यांच्या पत्नी श्रीमती तब्बासुम अन्सार शेख यांनी त्यांच्या पतीला देय असणारी कोव्हिड-१९ विमा कवच मधील रक्कम मिळण्याबाबत दिनांक २८/०४/२०२१ रोजीच्या निवेदनाद्वारे विनंती केली आहे. सबब कै.(श्री.) शेख यांच्या वारसास वित्त विभागाच्या संदर्भ क्र.(१) येथील दि. २९/०५/२०२० च्या शासन निर्णयानुसार रु.५०.०० लक्ष रकमेचे सानुग्रह सहाय्य देण्याबाबतचा प्रस्ताव शिक्षण संचालक (माध्यमिक), पुणे यांनी संदर्भ क्र.(३) येथील पत्रांन्वये शिफारसीसह सादर केला आहे.

३. कै.(श्री.) शेख अन्सार ईस्माईल, सहशिक्षक, श्रीमती.पवित्राबाई दैठणकर हाय.रत्नापूर ता.परांडा जि. धाराशिव या शाळेत दिनांक ०४/११/२००३ पासून कार्यरत होते.

४. ग्रामपंचायत कार्यालय रत्नापूर यांचे दि.२१/०४/२०२१ रोजीच्या आदेशान्वये कै.(श्री.) शेख यांची कोव्हीड १९ प्रतिबंध साथ रोग नियंत्रण उपाय कामी ग्रामस्तरीय दक्षता समिती मौजे रत्नापूर ग्रामपंचायत

कार्यालय रत्नापूर यांचे दि.२८/०४/२०२१ आदेशान्वये दि.२९/०४/२०२१ ते दि.३०/०४/२०२१ या कालावधीत नेमणूक करण्यात आली होती. सदर आदेशानुसार कै. (श्री.) शेख हे कर्तव्यावर हजर असल्याबाबत (१) गट शिक्षणाधिकारी, पंचायत समिती परंडा (२) गट विकास अधिकारी, पंचायत समिती परंडा (३) तहसिलदार, परंडा यांनी प्रमाणित केले आहे.

५. कै. (श्री.) शेख यांची दि. १२/०५/२०२१ रोजी केलेली कोव्हिड-१९ चाचणी पॉझिटिव्ह आली असल्याचे दिसून येते. कै. (श्री.) शेख हे राष्ट्रीय आपत्ती व्यवस्थापन अधिनियमान्वये स्थापित कोव्हीड-१९ प्रतिबंध साथरोग कारण उपाय कामी ग्रामपंचायत मौजे रत्नापूर ता.परांडा येथील कोव्हीड-१९ ग्रामस्तरीय दक्षता समिती मध्ये कोव्हीड प्रतिबंधक उपाय योजने कामी कर्तव्यावर हजर होते. ते दवाखान्यात दाखल होण्याच्या पूर्वी १४ दिवसाच्या काळात कोव्हिड कर्तव्यावर हजर असलेबाबत गटविकास अधिकारी, (वर्ग-१) पंचायत समिती, परंडा व गट शिक्षणाधिकारी, पंचायत समिती परंडा यांनी प्रमाणित केले आहे.

६. कै. (श्री.) शेख यांच्यावर दिनांक १२/०५/२०२१ ते १५/०५ २०२१ या कालावधीत इंदुमती मल्टिस्पेशालिटी हॉस्पिटल जामखेड, अहमदनगर येथे उपचार घेण्यात आले. आहे. कै. (श्री.) शेख यांचेवर दि.१५/०५/२०२१ ते २१/०५/२०२१ या कालावधीत अहमदनगर बर्न सेंटर येथे उपचार करण्यात आल्याचे दिनांक २१/०५/२०२१ हॉस्पीटलचे प्रमाणपत्र सादर केले आहे. दिनांक २१/०५/२०२१ रोजी कोव्हिड-१९ लागण होऊन मृत्यु झाल्याचे वैद्यकीय प्रमाणपत्र फॉर्म क्र.४ द्वारे वैद्यकीय अधिक्षक, अहमदनगर बर्न सेंटर, अहमदनगर यांनी प्रमाणित केले आहे.

७. कै.(श्री.) शेख यांचा दिनांक २१/०५/२०२१ रोजी मृत्यु झाल्याबाबतचे मृत्यु प्रमाणपत्र उपनिबंधक (जन्म व मृत्यु), अहमदनगर यांचे प्रमाणपत्र सादर करण्यात आले आहे.

८. मा. दिवाणी न्यायाधिश कनिष्ठ स्तर, परांडा यांनी कै. (श्री.) शेख यांचे कायदेशिर वारस म्हणून (१) श्रीमती तब्बासुम अन्सार शेख (२) आनम अन्सार शेख (३) रेहान अन्सार शेख यांना घोषित केले आहे.

९. कै.(श्री.) शेख अन्सार ईस्माईल, सहशिक्षक, श्रीमती.पवित्राबाई दैठणकर हाय.रत्नापूर ता.परांडा जि.धाराशिव यांना २२०२ ०४४२ या लेखशिर्षातून मासिक वेतन अदा करण्यात येत असल्याचे शिक्षणाधिकारी (माध्यमिक), जिल्हा परिषद, धाराशिव यांनी प्रमाणित केले आहे.

११. तहसिलदार, परंडा व वैद्यकीय अधिक्षक, अहमदनगर बर्न सेंटर, अहमदनगर यांनी प्रमाणित केल्यानुसार तसेच मा. दिवाणी न्यायाधिश कनिष्ठ स्तर, परंडा यांनी कै.(श्री.) शेख यांचे कायदेशिर वारस म्हणून घोषित केल्यानुसार(१) श्रीमती तब्बासुम अन्सार शेख (पत्नी) (२) आनम अन्सार शेख (३) रेहान अन्सार शेख यांना एकत्रित रु.५० लक्ष (रुपये पन्नास लक्ष फक्त ) इतक्या रकमेचे सर्वकष वैयक्तिक अपघात विमा कवच/सानुग्रह सहाय्य प्रदान करण्यास वित्त विभागाच्या दिनांक २९/०५/२०२० च्या शासन निर्णयानुसार याद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

१२. प्रस्तुत प्रस्तावावरील खर्च वित्त विभागाच्या अभिप्रायानुसार अनौपचारिक संदर्भ क्र.२७२/व्यय-५, दिनांक २४/०२/२०२५ अन्वये खाली नमूद लेखाशीर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात येईल.

"मागणी क्रमांक ई-२, (००)(०१) सर्वसाधारण शाळांना सहायक अनुदान
अनिवार्य (२२०२ ०४४२), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर)."

१३. सदर निधी वितरित करण्यासाठी आयुक्त (शिक्षण), पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर निधी संबंधितांना प्रत्यक्षपणे प्रदान झाल्याबाबतची माहिती प्रमाणीकरणासह सादर करावी.

१४. सदर शासन ज्ञापन, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संकेतांक २०२५०३०५१६११५५१८२१ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

TUSHAR VASANT MAHAJAN

Digitally signed by TUSHAR VASANT MAHAJAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORT DEPARTMENT, 2.5.4.20=19c6c23f510a80926e9b7ee5db235979452f3f9e891811863 4069a6cc7a22b9f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1A39CEF3C157B9EE6A2ABE5779ACF233682613F7B9 C335D6BF4877267695CECA, cn=TUSHAR VASANT MAHAJAN
Date: 2025.03.05 16:13:05 +05'30'

**( तुषार महाजन )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत, माहिती व आवश्यक कार्यवाहीकरीता :-**

१. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
२. शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य,पुणे
३. विभागीय शिक्षण उपसंचालक, लातूर विभाग, लातूर.
४. जिल्हा कोषागार अधिकारी, धाराशिव.
५. अधिक्षक, वेतन व भविष्य निर्वाह निधी पथक, (माध्यमिक), धाराशिव.

**प्रत माहितीसाठी :-**

१. वित्त विभाग (व्यय-९)/(व्यय-५), मंत्रालय, मुंबई
२. कक्ष अधिकारी/अवर सचिव (एस.एम.४)/अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
३. श्रीमती तब्बासुम अन्सार शेख (कै. (श्री.) शेख अन्सार ईस्माईल यांच्या पत्नी.)
४. निवड नस्ती/(टीएनटी-६) (प्र.क्र.५/२०२५)